ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF) मालिका-२४ अंतर्गत नाबार्डकडून प्राप्त होणाऱ्या कर्जातून मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छीमारांना मुलभुत सोयी सुविधा उपलब्ध करण्याच्या- कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

## महाराष्ट्र शासन
### कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११८/प्र.क्र. ८६/पदुम-१४
### मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
### दिनांक : २७ डिसेंबर, २०१८

**वाचा :**

१) वित्त विभागाचे पत्र क्र. नाबार्ड-२०१८/प्र.क्र. ७१/अर्थबळ, दि. ०५.१०.२०१८

२) नाबार्ड पत्र क्र. एन.बी. एमआरओ. एसपीडी/५३६६/आरआयडीएफ-२४(महाराष्ट्र)/ आयएससी ३५/२०१८-१९, दि. १३.१२.२०१८

३) आयुक्त, मत्स्यव्यवसाय कार्यालयाचे पत्र क्र. मत्स्य/अभि/१८०२०१/३२४/२०१७-१८, दि. १८.१२.२०१८

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रातील सागरी जिल्ह्यांमध्ये असणाऱ्या मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छीमारांसाठी बऱ्याच ठिकाणी फार कमी प्रमाणात मुलभुत सोयी-सुविधा उपलब्ध आहेत. ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF) मालिका-२४ अंतर्गत नाबार्डकडून प्राप्त होणाऱ्या कर्जातून मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छीमारांना मुलभुत सोयी सुविधा उपलब्ध करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. त्यानुसार मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पासाठी ९५ टक्के निधी नाबार्डमार्फत तर उर्वरीत ५ टक्के निधी राज्य शासनामार्फत पुरविण्यात येतो.

सन २०१८-१९ करिता नाबार्ड अर्थसहाय्यित ग्रामीण पायाभुत विकास निधी योजना अंतर्गत मिळणाऱ्या कर्जाचे मालिका-२४ करिता वाचा-१ येथील पत्रान्वये वित्त विभागाने रू. १८०.५१ कोटी रकमेची ४ कामे नाबार्ड, पुणे यांच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आली होती, त्यापैकी नाबार्डने उपरोक्त वाचा-२ येथील पत्रान्वये मत्स्यव्यवसाय विभागासाठी ०२ कामांना ९५ टक्के हिश्यांतर्गत रू. ७५२५.८९ लक्ष तर राज्य शासनाचा हिश्यासाठी रू. ३९६.१० लक्ष अशा प्रकारे एकूण रू. ७९२१.९९४ लक्ष इतक्या रकमेचा निधी मंजुर झाल्याचे कळविले आहे. त्यानुषंगाने सदर ०२ कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

ग्रामीण पायाभुत विकास निधी (RIDF) योजनेंतर्गत मालिका-२४ मध्ये नाबार्डकडून प्राप्त होणाऱ्या कर्जामधुन राज्यातील सागरी जिल्ह्यामध्ये मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभुत सोयी-सुविधा उपलब्ध करण्यासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" मध्ये नमूद ०२ प्रकल्पांच्या कामासाठी नाबार्डने मंजूर केलेला ९५ टक्के हिस्सा रू. ७५२५.८९ लक्ष तर राज्य शासनाचा हिस्सा रू. ३९६.१० लक्ष अशा प्रकारे एकूण रू. ७९२१.९९४ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर कामावरील खर्च नाबार्ड अंतर्गत प्राप्त होणारा ९५ टक्के निधी ४४०५ ३२९२ या लेखाशिर्षातून तर राज्य शासनाचा उर्वरीत ५ टक्के निधी ४४०५ ३३०९ या लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर कामांची प्रचलित नियमानुसार निविदा प्रक्रियेबाबतची पुढील कार्यवाही करावी व आवश्यक त्या स्तरावरील ना-हरकत परवानगी प्राप्त करून घेण्यात यावी. सदरहू कामांतर्गत झालेल्या खर्चाच्या प्रतिपुर्तीचे दावे विहित प्रपत्रात वेळेच्या वेळी नाबार्डकडे सादर करण्यात यावेत. तसेच झालेल्या कामांचा दर तिमाही आढावा घेवून शासनास अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४९९/२०१८/व्यय-२, दि. १९.०९.२०१८ ला अनुलक्षून निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२७१६५४१४७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.12.27 16:59:24 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. मुख्य महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, महाराष्ट्र क्षेत्रीय कार्यालय, पुणे

७. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. सहआयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई

९. कार्यकारी अभियंता, आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय,मुंबई

१०. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई विभाग, मुंबई.

११.सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, पालघर/ठाणे/मुंबई उपनगर/मुंबई शहर /रायगड / रत्नागिरी /सिंधुदुर्ग

१२. जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी, पालघर/ठाणे/मुंबई उपनगर/मुंबई शहर/ रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग

१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ (लेखापरिक्षा, लेखा व अनुज्ञेयता)

१४. वित्त विभाग, (व्यय-१/अर्थसंकल्प-१५/अर्थोपाय, अर्थबळ, मंत्रालय, मुंबई-३२

१५.निवडनस्ती.

**शासन निर्णय क्र. मत्स्यवि २०१८/प्र.क्र.८६/पदुम १४**

**दिनांक : २७ डिसेंबर, २०१८**

## प्रपत्र "अ"

| अ.क्र. | कामाचे नाव व ठिकाण | कामाचे स्वरूप | प्रकल्प किंमत (रू. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | नवाबाग, ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथील मासळी उतरविण्याच्या केंद्राच्या ठिकाणी मच्छीमारांना मुलभुत सुविधा पुरविणे | जल भंजक भिंत (५०० मी.), वार्फ (५० मी X २० मी.), जोड रस्ता (३०० मी.) जेट्टीचे विस्तारीकरण (५०मी X ५मी), गाळ काढणे (६०० मी), सौर ऊर्जा दिवे – ६० नग | रू. ३६२५.३५९ |
| २ | नांदगाव, ता .मुरुड ,जि .रायगड येथील मासळी उतरविण्याच्या केंद्राच्या ठिकाणी मच्छीमारांना मुलभुत सुविधा पुरविणे | जल भंजक भिंत (८५० मी.), वार्फ (१५० मी X ३० मी.), गाळ काढणे (६५० मी), सौर ऊर्जा दिवे – ६० नग | रू. ४२९६.६३५ |
| | | **एकूण** | **रू. ७९२१.९९४** |